**नागपूर हिवाळी अधिवेशन कालावधीत पदाधिकारी /अधिकारी/कर्मचारी यांनी शासकीय वाहनांचा वापर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः नाहिअ ३०१४/ प्र.क्र. ६८ / सात**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई - ४००० ३२.

तारीख: २१ नोव्हेंबर, २०१४

<u>वाचा :</u>

१) शासन परिपत्रक, सा.प्र.विभाग क्रमांक: एनएएस-२००४/प्र.क्र.१३५/०४/सात, दि. ०१ डिसेंबर, २००४

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: प्रवास-१०९०/प्र.क्र.३२०/९०/सेवा-५, दि.१७ ऑक्टोबर,१९९०

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः प्रवास-१००५/प्र.क्र.३३/सेवा-५, दि. ०८ जुलै, २००५.

४) शासन परिपत्रक, सा.प्र. विभाग क्रमांकः नाहिअ २४१३/प्र.क्र.१२९/ सात, दि. ११ ऑक्टोबर, २०१३.

<u>प्रस्तावना :</u>

नागपूर हिवाळी अधिवेशन कालावधीत पदाधिकारी /अधिकारी/कर्मचारी यांनी शासकीय वाहनाचा वापर करण्याबाबत संदर्भाधिन अनुक्रमांक १ च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या आहेत. संदर्भाधिन अनुक्रमांक २ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे शासकीय वाहनांच्या खाजगी कामासाठी केलेल्या वापराचे दर नमूद करण्यात आले आहेत. या दरात संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील दि. ८ जुलै, २००५ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली आहे. त्यानुसार या विभागाने संदर्भाधीन दिनांक ११ ऑक्टोबर, २०१३ च्या शासन परिपत्रकान्वये निदेश दिले आहेत.

**शासन परिपत्रक :**

नागपूर येथील विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशन कालावधीत मंत्री, राज्यमंत्री तसेच शासनाचे व महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाचे अधिकारी व मंत्रालयीन शिबीर कार्यालय इत्यादींसाठी आवश्यक असलेली वाहने (मोटार व जीप्स ) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांच्याकडून अधिवेशनाचे कामकाज पार पाडण्यासाठी अधिग्रहीत केली जातात. सदर शासकीय वाहनांच्या इंधनावरील खर्चात काटकसर करण्याच्या दृष्टीने नेमका कसा वापर करण्यात यावा याबाबतीत खालीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत.

अ) शासकीय वाहने शासकीय कामकाजासाठी सुध्दा शक्यतो नागपूर शहराच्या हद्दीबाहेर नेण्यात येऊ नये.

ब ) तथापि तरीही काही अपरिहार्य कारणास्तव शासकीय वाहनांचा नागपूर शहरांच्या हद्दीबाहेर वापर झालाच तर ही वाहने नागपूर शहराच्या हद्दीबाहेर नेण्यासाठी योग्य ती समर्थनीय कारणे विभागीय आयुक्त, नागपूर यांना सादर करुन या वाहनांचा वापर करण्यासाठी रीतसरपणे त्यांची परवानगी घेण्यात यावी.

क) सदरील शासकीय वाहनांचा वापर हा दरदिवशी ८० कि.मी. च्या वर जाणार नाही याद्दष्टीने संबधितांनी खबरदारी घ्यावी.

२. शासकीय वाहनांचा वापर शासकीय कामकाजासाठी करण्याबाबत वरीलप्रमाणे शासनाचे स्थायी स्वरुपाचे निदेश असले तरीही काही पदाधिकारी, अधिकारी / कर्मचारी यांच्याकडून नागपूर येथील विधीमंडळाच्या हिवाळी अधिवेशन कालावधीत खाजगी कामासाठी गैरवापर केला जातो, असे आरोप वर्तमानपत्रांतून केले जातात. तसेच विविध सामाजिक संस्थांकडून अशा आशयाच्या तक्रारी शासनाकडे प्राप्त होतात. त्यामुळे अशा तक्रारींची दखल शासनाला घेणे क्रमप्राप्त होते. तेव्हा शासकीय वाहनाच्या खाजगी वापरावर प्रतिबंध आणण्याच्या दृष्टीने काय उपाययोजना करता येतील याबाबत शासनस्तरावर सखोल विचार केल्यानंतर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत.

अ) या शासन परिपत्रकातील उपरोक्त परिच्छेदातील निदेश लक्षात घेता शासकीय वाहनांचा खाजगी वापर अपेक्षित नाही हे स्पष्ट आहे. तथापि नागपूर अधिवेशन कालावधीत काही अपरिहार्य कारणास्तव शासकीय वाहनांचा खाजगी वापर अनिवार्य झाला असेल तर, अशा परिस्थितीत शासन निर्णय क्र.प्रवास-१००५/प्र.क्र.३३/सेवा-५, दि. ०८ जुलै, २००५ मधील तरतुदीनुसार प्रत्येक शासकीय वाहनाच्या खाजगी वापरासाठी पेट्रोल व डिझेल वर चालणा-या सर्व वाहनांसाठी सरसकटपणे रु. ८ /- (रुपये आठ फक्त) प्रति किलोमिटर या दराने होणारी रक्कम संबंधितांनी विभागीय आयुक्त, नागपूर यांच्याकडे त्वरीत भरणा करावी.

ब) शासकीय वाहन खाजगी वापरात असताना त्यासाठी असलेला खोळंब्याचा (Detention ) सध्याचा दर प्रति तास रु ३/- व कमाल रु ३०/- प्रतिदिवशी, इतका असेल. खोळंब्याचा काळ मोजताना पहिल्या तीन तासांचा वापर सोडण्यात यावा.

क) शासकीय वाहनाचा वरील कार्यपध्दतीनुसार खाजगी वापर करण्यापूर्वी संबंधित पदाधिकारी/अधिकारी/कर्मचारी यांनी सदरहू वापराबाबतची सर्व तपशिलवार माहिती विभागीय आयुक्त, नागपूर यांना उपलब्ध करुन द्यावी.

ड) वरील निदेश /सूचना अधिग्रहित करण्यात येणा-या वाहनांच्या सर्व वाहनचालकांच्या निदर्शनास आणाव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२५११५४३२१२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prem Singh Meena

Digitally signed by Prem Singh Meena
DN: c=IN, o=all india services, ou=IAS, postalCode=110003, st=New Delhi, cn=Prem Singh Meena
Date: 2014.11.25 12:02:48 +05'30'

**(डॉ. पी.एस. मीना)**

अपर मुख्य सचिव (प्र.सु., र. व का.)

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४. सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई .
५. मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. विभागीय आयुक्त, नागपूर /अमरावती /औरंगाबाद/नाशिक.
७. जिल्हाधिकारी, नागपूर.
८. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक १, नागपूर.
१०. सर्व मंत्रालयीन विभागाचे शिबीर कार्यालय, नागपूर.
११. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.